**<u>अर्थसंकल्पीय अनुदान, सन २०१०-२०११.</u>**
**बृहन्मुंबईला पाणी पुरवठा करणा-या भातसई प्रकल्पाकरिता ठाणे पाटबंधारे मंडळ ठाणे यांना अनुदान.**
**लेखाशीर्ष वाय-६, ४२१५, भांडवली खर्च (४२१५ ०१०७), अंशदान**
---------------------------------------

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक भाप्रअ-४२१०/भांडवली खर्च/प्र.क्र.७८/पापु-२४**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२.**
**दिनांक : ०९ मार्च, २०११.**

**<u>वाचा:-</u>**

१) शासन निर्णय क्रमांक भाप्रअ-४२१०/भांडवली खर्च/प्र.क्र.७८/पापु-२४, दिनांक २९ एप्रिल, २०१०.
२) शासन निर्णय क्रमांक भाप्रअ-४२१०/भांडवली खर्च/प्र.क्र.७८/पापु-२४, दिनांक १९ मे, २०१०.
३) शासन निर्णय क्रमांक भाप्रअ-४२१०/भांडवली खर्च/प्र.क्र.७८/पापु-२४, दिनांक २२ ऑक्टोबर, २०१०.
------------------------------------------------------------------------------------------

**<u>प्रस्तावना :-</u>**

सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षात विधीमंडळाने मंजूर केलेल्या अनुदानाच्या तरतूदींच्या अनुषंगाने नागरी भागातील पाणी पुरवठा कार्यक्रम, या योजनांतर्गत कार्यक्रमाखालील नागरी भागातील बृहन्मुंबईला पाणी पुरवठा करणा-या भातसई प्रकल्पाकरिता, **<u>मागणी क्रमांक वाय-६, ४२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता यावरील भांडवली खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (४२१५०१०७) अंशदान, या कार्यक्रमाकरीता रुपये ०१,८३,५२,०००/- (रुपये एक कोटी त्र्याऐंशी लाख बावन्न हजार फक्त) इतके अनुदान मंजूर करण्यात आले आहे.</u>**

२. सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षात मंजूर अर्थसंकल्पीय अनुदानापैकी उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये रुपये ०१,४६,४०,०००/- (रुपये एक कोटी सेहेचाळीस लाख चाळीस हजार फक्त) इतके अनुदान फेब्रुवारी, २०११ अखेर मुक्त करण्यात आलेले आहे.

३. आता माहे मार्च, २०११ या महिन्याकरिता रुपये ३७,१२,०००/- (रुपये सदोत्तीस लाख बारा हजार फक्त) इतके अनुदान मुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यास अनुसरुन पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**(कृपया मागे पहावे.)**

**शासन निर्णय : -**

बृहन्मुंबईला पाणी पुरवठा करणा-या भातसई प्रकल्पाचे कार्यान्वयन अधीक्षक अभियंता, ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे यांच्याकडून करण्यात येते. भातसई प्रकल्पाच्या कार्यान्वयनाकरिता- प्रकल्प योजना पुढे कार्यरत ठेवण्याकरिता - सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षात मागणी क्रमांक वाय-६, ४२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता यावरील भांडवली खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (४२१५ ०१०७) अंशदान, या लेखाशीर्षाखाली मंजूर असलेल्या अनुदानापैकी, या शासन निर्णयान्वये रुपये ३७,१२,०००/- (रुपये सदोत्तीस लाख बारा हजार फक्त) इतके अनुदान अधीक्षक अभियंता,ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे यांना पुढील अटींच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे. या मुक्त तरतूदीचे वाटप सोबतच्या विवरणपत्रातील **"स्तंभ ०५" मध्ये** दर्शविण्यात आले आहे.

- मुक्त अनुदानाच्या रकमेचे स्वतंत्र लेखे ठेवण्यात यावे.
- मुक्त अनुदानाची रक्कम ज्याकरिता मंजूर करण्यात आलेली आहे त्या विनिर्दिष्ट प्रयोजनाकरिताच दिनांक ३१ मार्च, २०११ पर्यंत खर्च करावी.
- मुक्त अनुदानातून होणा-या वाटपाबाबतची माहिती अधीक्षक अभियंता, ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे यांनी शासनाला कळवावी.
- मुक्त अनुदानातून भातसई प्रकल्पाच्या संबंधित कामाकरिता केलेल्या खर्चाचे लेखे तपासणीचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र, मुंबई यांना किंवा खास अधिकार दिलेला या विभागातील अधिकारी यांना देण्यात येत आहे. याबाबतची संबंधित कागदपत्रे, महालेखापाल किंवा खास अधिकार दिलेला विभागातील अधिकारी यांनी मागणी केल्यास त्यांना तात्काळ उपलब्ध करुन द्यावीत.
- मुंबई वित्तिय नियम १९५९ मधील जोडपत्र-२ मधील नियम क्रमांक ३ अनुसार महालेखापाल यांच्या मागणीनुसार लेखे संबंधित कागदपत्रांसह निरीक्षणाकरिता महालेखापाल यांना सादर करावे.
- मुक्त अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनाकडे सादर करावे तसेच उपयोगिता प्रमाणपत्राच्या प्रती महालेखापाल यांनाही पाठवाव्यात.
- मुक्त केलेल्या अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा आणि विहित अहवाल विहित दिनांकास, लेखा अधिकारी, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई-४०००३२ यांच्याकडे सादर करावा.

२. या मुक्त अनुदानातून होणारा खर्च, मागणी क्रमांक वाय-६, ४२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता यावरील भांडवली खर्च ०१, पाणीपुरवठा- १०१, नागरी पाणीपुरवठा- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- (०१) (०२) बृहन्मुंबईला पाणी पुरवठा करण्यासाठी भातसई प्रकल्प (४२१५ ०१०७) ३२, अंशदान, या लेखाशीर्षाखाली खर्ची घालावा व त्याखालील मंजूर तरतूदीतून भागवावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १३३/११/अर्थसंकल्प-१८, दिनांक २८ फेब्रुवारी, २०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **२०११०३०९१९२३०३००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( वि.गो. औगड)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) अधीक्षक अभियंता, ठाणे पाटबंधारे मंडळ, सिंचन भवन, तिसरा मजला, कोपरी कॉलनी, ठाणे ( पूर्व ), ४००६०३, जिल्हा ठाणे.
२) महालेखापाल, महाराष्ट्र- १, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) ओल्ड सी. जी. ओ. इमारत, न्यू मरीन लाईन्स, १०१, महर्षी कर्वे मार्ग, मुंबई - ४०००२०.
३) महालेखापाल, महाराष्ट्र- २, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) भारतीय लेखा व लेखापरीक्षा विभाग कार्यालय, सिव्हिल लाईन्स, वेस्ट हायकोर्ट रोड, नागपूर - ४४०००१
४) मुख्य अभियंता, पाटबंधारे विभाग, कोंकण प्रदेश, हॉंगकॉंग बॅंक बिल्डींग, चौथा मजला, फोर्ट, मुंबई - ४०००२३.
५) कार्यकारी अभियंता, भातसा धरण विभाग क्रमांक १, भातसा नगर, तालुका शहापूर, जिल्हा ठाणे - ४२१६०३.
६) अधिदान व लेखा अधिकारी, शासकीय कुटीर, नरिमन पॉंईंट, मुंबई - ४०००२१.
७) निवासी लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय इमारत, सातवा मजला, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई - ४०००५१.
८) कोषागार अधिकारी, ठाणे. जिल्हा ठाणे.
९) उप सचिव, पाटबंधारे विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१०) कक्ष अधिकारी, मोप्र-०१, पाटबंधारे विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
११) वित्त विभाग, कार्यासन क्रमांक व्यय-३, अर्थसंकल्प-१८ , मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१२) नियोजन विभाग, कार्यासन क्रमांक १४४३ मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
१५) मा.आमदार व खासदार (सर्व)
१६) ग्रंथालय, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई ४०० ०३२. (१० प्रतींसह)
१३) कार्यासन क्रमांक, पापु-०४, २०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई-४०००३२.
१४) संगणक कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१५) निवडनस्ती, पापु-२४.

---

(कृपया मागे पहावे)

शासन निर्णय क्रमांक भाप्रअ-४२१०/भांडवली खर्च/प्र.क्र.७८/पापु-२४ दिनांक ०९ मार्च, २०११ सोबतचे विवरणपत्र.

**विवरणपत्र**

(रुपये)

| अ. क्र. | आर्थिक लेखाशीर्ष | सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदान | आतापर्यंत मुक्त केलेले अनुदान | या शासन निर्णयान्वये मुक्त करण्यात आलेले अनुदान |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | **मागणी क्रमांक वाय-६, ४२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता यावरील भांडवली खर्च ०१, पाणीपुरवठा-१०१, नागरी पाणीपुरवठा-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-(०१) (०२) बृहन्मुंबईला पाणीपुरवठा करण्यासाठी भातसाई प्रकल्प (४२१५ ०१ ०७) ३२, अंशदान** | ०१,८३,५२,००० | ०१,४६,४०,००० | **३७,१२,०००** |
| | एकूण | ०१,८३,५२,००० | ०१,४६,४०,००० | **३७,१२,०००** |

( वि.गो. औगड)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

******************************************************************

-----------------------------------------------------------------------------------------------